**वन विभागातंर्गत सहायक वनसंरक्षक, वनक्षेत्रपाल, वनरक्षक व सर्व्हेक्षक या संवर्गातील सरळसेवेची रिक्त पदे भरण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. एफएसटी-०८/१७/प्र.क्र.४७६/फ-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक - २८ जून, २०१८.

<u>वाचा -</u> १) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही २०१५/प्र.क्र.२९०/का.१२, दि. १६ जुलै, २०१५.
२) शासन निर्णय वित्त विभाग क्र. संकिर्ण २०१५/प्र.क्र.४१/अर्थ-१, दि. २ जून, २०१५.
३) शासन निर्णय वित्त विभाग क्र. संकिर्ण २०१५/प्र.क्र.६४/२०१५/वित्तीय सुधारणा-१, दि. १५ जानेवारी, २०१६.
४) शासन निर्णय वित्त विभाग क्र. पदनि-०६१७/प्र.क्र.२०/आ.पु.क. दि. ९ जुन, २०१७.
५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन दुय्यम संवर्ग), नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१० (२)/आस्था / एक/प्र.क्र.१२०(१७-१८)/१९० दि.१८/०८/२०१७.

**<u>प्रस्तावना :-</u>**

शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग दि. १६ जुलै, २०१५ अन्वये शासकीय विभाग कार्यालयातील गट-अ ते गट-ड संवर्गात पद भरती करतांना संवर्ग व्यवस्थापन/ आर्थिक नियोजन व कामाचे नियोजन इ. बाबी लक्षात घेऊन पद भरतीकरिता मार्गदर्शक सुचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. तसेच शासन निर्णय वित्त विभाग २ जुन, २०१५ व दि. १५ जानेवारी, २०१६ अन्वये वेतनावरील खर्च नियंत्रित करण्याच्या अनुषंगाने गट-अ ते गट-ड मधील संवर्गातील सरळ सेवेच्या कोटयातील रिक्त असलेल्या पदांपैकी ५० टक्के किंवा एकूण संवर्गाच्या ४ टक्के यापैकी जे कमी असेल इतकीच पदे भरण्याबाबत आदेश पारित करण्यात आले आहेत.

वन विभागाकडून अलीकडेच ५० कोटी वृक्ष लागवड मोहीम हाती घेण्यात आलेली आहे, याचाच भाग म्हणुन सन २०१८ मध्ये एका वर्षात १३ कोटी वृक्षांची लागवड तसेच सन २०१९ मध्ये ३३ कोटी वृक्षांची लागवड व संरक्षणाची कामे अपेक्षित आहेत. त्याचप्रमाणे वन विभागात अनेक नवीन योजनांची अंमलबजावणी सुरु आहे. सध्याचे वनेत्तर क्षेत्रात ३ टक्के वृक्षाच्छादन आहे ते १५ टक्के वाढवायचे आहे या करिता वन विभागास अधिकारी / कर्मचाऱ्यांची नितांत गरज भासत आहे.

पर्यावरण, वन व त्यानुषंगिक उपजिविकेची सुरक्षितता यामध्ये वन विभागाची असलेली महत्त्वपूर्ण भूमिका विचारात घेता, तसेच वन विभागाचे वेगळे महत्त्व, इतर विभागांपेक्षा भिन्न कामे आणि विभागांतर्गत सुरू असलेले महत्त्वाकांक्षी कार्यक्रम व त्यांच्या यशस्वी अंमलबजावणीसाठी सहायक वनसंरक्षक, वनक्षेत्रपाल, वनरक्षक व सर्व्हेक्षक या संवर्गातील सरळसेवेची रिक्त पदे भरण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

वन विभागांतर्गत सुरू असलेले महत्त्वाकांक्षी कार्यक्रम व त्यांच्या यशस्वी अंमलबजावणीसाठी सहायक वनसंरक्षक, वनक्षेत्रपाल, वनरक्षक व सर्व्हेक्षक या संवर्गातील सरळसेवेची डिसेंबर, २०१७ ते डिसेंबर, २०१९ अखेर पर्यंत दरवर्षी रिक्त होणारी पदे पुढील २ वर्षे १०० टक्के भरण्यास शासन निर्णय संदर्भ क्र. ४ अन्वये अपर मुख्य सचिव(साप्रवि) यांच्या अध्यक्षतेखाली गठित करण्यात आलेल्या उपसमितीने मान्यता दिली आहे.

२. त्याअनुषंगाने वन विभागांतर्गत सहायक वनसंरक्षक, वनक्षेत्रपाल, वनरक्षक व सर्व्हेक्षक या संवर्गातील सरळसेवेची डिसेंबर, २०१७ ते डिसेंबर, २०१९ अखेर पर्यंत दरवर्षी रिक्त होणारी पदे पुढील २ वर्षे १०० टक्के भरण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. सदरहू आदेश वित्त विभाग अनौ.संदर्भ क्र.३६९/आपुक दि.२०/०६/२०१८ तसेच सामान्य प्रशासन विभागाचा अनौ. संदर्भ अमुस(सेवा)/साप्रवि क्र.६ दि. २७/०६/२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१८०६२८१४०८१७६४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Atul Ashok Kode

Digitally signed by Atul Ashok Kode
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a12403ed93b05957cb29b7e95265d3ac52d366233b80405514f23a879132aeec, serialNumber=f0d5ee4c99cc9cbfa8761b3ddc7bd6650bad33302f33a35400ad5aad2291371a, cn=Atul Ashok Kode
Date: 2018.06.28 14:13:42 +05'30'

**(अतुल कोदे)**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे सचिव,
२) मा. मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव
३) अपर मुख्य सचिव (सेवा) सामान्य प्रशासन विभाग
४) प्रधान सचिव (लेखा व कोषागारे) वित्त विभाग
५) सचिव (व्यय) वित्त विभाग
६) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
७) प्रधान मुख्य वनसंरक्षक (सर्व)
८) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (सर्व)
९) मुख्य वनसंरक्षक /वनसंरक्षक / उप वनसंरक्षक (सर्व)

१०) महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर
११) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, (सर्व)
१३) विभागीय वन अधिकारी / उप विभागीय वन अधिकारी (सर्व)
१४) कार्यासन अधिकारी , कार्यासन-आपुक-वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) कार्यासन अधिकारी , कार्यासन-१२-साप्रवि, मंत्रालय, मुंबई.
१६) मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
१७) मा.राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
१८) सचिव (वने) यांचे स्वीय सहाय्यक
१९) निवड नस्ती (फ-४ / फ-८ कार्यासन).